हिल स्टेशन विभागामध्ये टूरिस्ट/हॉलीडे रिसॉर्टस्/हॉलीडे होमस् विकसित करण्यासाठी विशेष नियंत्रण नियमावली.

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम २०[३] अन्वये गौण फेरफाराच्या प्रस्तावास मंजूरी देणेबाबत...

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय:क्रमांक टिपीएस-१८९६/१२३१/सीआर-१२३/नवि-१३,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: २६ नोव्हेंबर १९९६.

शासन निर्णय: सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

[विद्याधर देशपांडे]
महाराष्ट्र शासनाचे उपसचिव.

प्रति,

सर्व विभागीय आयुक्त,

महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण मुंबई.

संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.

सर्व जिल्हाधिकारी.

सर्व विभागीय उपसंचालक नगर रचना.

सर्व मंत्रालयीन विभाग.

सर्व सहाय्यक संचालक नगर रचना, जिल्हा कार्यालये.

सर्व नगर रचनाकार, जिल्हा कार्यालये.

व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, मुंबई
[त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सोबत पाठविलेली शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासन असाधारण राजपत्रात [केंद्र] प्रसिध्द करुन त्याच्या १०० प्रती या विभागास व संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पाठवाव्यात.]

व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर.
[त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्र पुरवणीमध्ये, प्रसिध्द करुन त्याच्या १० प्रती या विभागास व संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पाठवाव्यात ].

.....

अधिसूचना

नगर विकास विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: २६ नोव्हेंबर १९९६.

क्रमांक: टीपीएस–१८९६/१२३१/प्र.क्र. १२३/९५/नवि–१३.

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम सन १९६६

ज्याअर्थी सोबत जोडलेल्या सूची "अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ [यापुढे "उक्त अधिनियम" असे संबोधिलेला ] च्या तरतूदीनुसार वेगवेगळ्या जिल्हयामध्ये प्रादेशिक योजना [यापुढे "उक्त प्रादेशिक योजना" असे संबोधिलेल्या ] शासनाने मंजूर केल्या असून सूचि "अ" मध्ये दर्शविलेल्या तारखेपासून त्या अंमलात आलेल्या आहेत.

आणि ज्याअर्थी शासनाने राज्यात गिरिस्थान विकासासाठी एक विशेष विकास नियंत्रण नियमावली [यापुढे "उक्त नियमावली" असे संबोधिलेली ]तयार करुन उक्त प्रादेशिक योजनांच्या विकास नियंत्रण नियमावलीमध्ये फेरफाराद्वारे [यापुढे "उक्त फेरफार" असे संबोधिलेला ] तिचा समावेश करण्यासाठी अधिसूचना क्र.टीपीएस–१८९६/१२३१/प्र.क्र. १२३/९६/नवि–१३, दि. ३ सप्टेंबर ९६ अन्वये जनतेकडून सूचना/हरकती मागविल्या होत्या.

आणि ज्याअर्थी शासनाकडे विहित मुदतीत प्राप्त झालेल्या सूचना/हरकतींचा विचार करुन उक्त नियमावलीत काही बदल करुन उक्त नियमावलीस मंजूरी देणे आवश्यक आहे असे शासनाचे मत आहे.

त्याअर्थी आता शासन उक्त अधिनियमाच्या कलम २०(३) अन्वये प्रदत्त शक्तीचा वापर करुन उक्त सुधारित नियमावलीस मान्यता देत आहे व त्यासाठी सूची "अ" मध्ये नमूद मंजूर प्रादेशिक योजनेच्या विकास नियंत्रण नियमावलीतील अंतिम नियमानंतर खालील नोंद समाविष्ट करण्यात येत आहे :–

"गिरिस्थान/पर्यटन/टुरिस्ट रिसॉर्ट विकसित करण्यासाठी शासनाने अंतिम केलेल्या विशेष विकास नियंत्रण नियमावलीचा समावेश करण्यात येत आहे".

[कृ. मा. प. ]

उक्त फेरफार अवलोकनार्थ खालील कार्यालयात कामकाजाचे दिवशी कार्यालयीन वेळेत ठेवण्यात आला आहे.

[१] संबंधित जिल्हाधिकारी.

[२] संबंधित सहाय्यक संचालक नगर रचना/नगर रचनाकार.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार
व नावाने.

र. चं. सिन्हा

[र. चं. सिनहा]
अप्पर मुख्य सचिव
नगर विकास विभाग.

NOTIFICATION
Urban Development Department
Mantralaya, Mumbai 400032.

Dated:- 26th Nov. 1996.

Maharashtra Regional & Town Planning Act 1966.

NO.TPS/1896/1231/CR-123/96/UD-13.

Whereas, Government have sanctioned Regional Plans for different Districts (hereinafter referred to as the "said Regional Plan"), as per the provisions of the Maharashtra Regional & Town Planning Act 1966 (hereinafter referred to as "the said Act") which are in force with effect from the dates mentioned in "सूची "अ".

And whereas, Government have prepared Draft Special Development Control Regulations (hereinafter referred to as "the said Regulations") for the development of Hill Stations in the State and Government intend to incorporate the said regulations in the Development Control Regulations of the said Regional Plans by making minor modifications (hereinafter referred to as "the said modification") and published the same under notification No.TPS-1896/1231/CR-123/96/UD-13, dated 3rd Sept.1996 for inviting suggestions/objections from general public.

And whereas, after considering the suggestions/objections received from public within the stipulated period, Government have come to conclusion that the said regulations shall be sanctioned with some changes,

Now, therefore, Government under powers vested under section 20(4) of the saidAct sanctions the said regulations with certain changes and for

(PTO)

that purpose amends the notification sanctioning the said Regional Plan as under :-

"After the last entry to the concerned Regulations of Regional Plan the following new entry shall be added:-

"Special Development Control Regulations as sanctioned by Government as per "सूची -ब" shall be inserted in the Development Control Regulations of the sanctioned Regional Plan".

The said Regulations are available for inspection in following offices during office hours on all working days :-

(1) Collector of District.

(2) Assistant Director of Town Planning/ Town Planner of District.

By order and in the name of Governor of Maharashtra

(R. C. SINHA)
Additional Chief Secretary
Urban Development Department.

## सूचि "अ"

### महाराष्ट्रातील मंजूर प्रादेशिक योजना

| अनु. क्र. | प्रदेशाचे नाव. | प्रादेशिक योजना शासनाने मंजूर केल्याची तारीख | प्रादेशिक योजना अंमलात आल्याची तारीख. |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १. | मुंबई महानगरी प्रदेश. | २. ६. १९७३ | १९. ८. १९७३ |
| २. | पुणे महानगरी प्रदेश [+] | ७. २. १९७६ | १५. ५. १९७६ |
| ३. | नागपूर महानगरी प्रदेश [+] | १४. २. १९७६ | २०. ५. १९७६ |
| ४. | कोल्हापूर -इचलकरंजी प्रदेश. | २०. ४. १९७८ | १. ६. १९७८ |
| ५. | नाशिक प्रदेश. | ८. ५. १९७८ | १. ७. १९७८ |
| ६. | औरंगाबाद -जालना प्रदेश. | २३. १०. १९८० | १. १२. १९८० |
| ७. | सांगली -मिरज जिल्हा प्रदेश. | १५. ३. १९८५ | ३०. ५. १९८५ |
| ८. | रत्नागिरी -सिंधुदुर्ग जिल्हा प्रदेश. | २३. १२. १९८७ | १५. २. १९८८ |
| ९. | महाबळेश्वर -पाचगणी प्रदेश. | १३. १२. १९८८ | १. २. १९८९ |
| १०. | जळगाव-भुसावळ जिल्हा प्रदेश. | १२. ११. १९९१ | १. २. १९९२ |
| ११. | चंद्रपूर-बल्लारपूर जिल्हा प्रदेश. | १८. ११. १९९१ | १. २. १९९२ |
| १२. | रायगड प्रदेश. | ४. ७. १९९२ | १५. ९. १९९२ |
| १३. | अमरावती जिल्हा प्रदेश. | २९. ५. १९९३ | १५. ८. १९९३ |

[+] पुणे व नागपूर या संपूर्ण जिल्हयांकरिता नव्याने केलेल्या प्रारुप प्रादेशिक योजना शासनाकडे मंजूरीसाठी सादर झालेल्या आहेत.

या नोटीसीद्वारे प्रसिध्द केलेल्या सूचना मंजूरीनंतर सदरहू दोन्ही जिल्हयातील संपूर्ण क्षेत्राकरिता लागू होतील.

.....